पर्यावरण विभाग मार्फत खरेदी करण्यात आलेल्या व निर्लेखित केलेल्या शासकीय वाहन क्रमांक एमएच-०१, एसए-१२ (होंडा सिटी) च्या विक्रीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्र.- संकीर्ण २०१६/प्र.क्र.७०/रोखशाखा**
नवीन प्रशासन भवन,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक - १६ मार्च, २०२०.

संदर्भ- १) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांचे पत्र क्र.जापशो/वा.त./२०१९/१८१७, दि. ०६/०७/२०१९
२) पर्यावरण विभाग शासन ज्ञापन क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र. ७० /रोखशाखा दि.२८/०८/२०१९.
३) निविदा पर्यावरण विभाग क्र.-संकीर्ण २०१६/प्र.क्र. ७० /रोखशाखा दि.१९/०९/२०१९.
४) वित्त विभाग परिपत्रक क्र. डीएफपी १०९१/प्र.क्र.४/विनियम दि.१८/०६/१९९१.
५) वित्त विभाग परिपत्रक क्र.विअप्र१०००/प्र.क्र.३१/२००१/विनियम दि.१५.०६.२००१
६) सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय शासन निर्णय क्र. मातंसं ०८०/६/२०१३- DIR-DIT (MH)/३९ दि.३.१२.२०१४
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. डीएफ१०१६/प्र.क्र.०७/१६/विनियम,दि.२२.०६.२०१६

प्रस्तावना:-

पर्यावरण विभागामार्फत सन मार्च २००५ मध्ये विहित कार्यपद्धती अवलंबून रू. ६,४७,३४९ / - इतक्या किंमतीस खरेदी करण्यात आलेले शासकीय वाहन क्र.एमएच-०१, एसए-१२ (होंडा सिटी) संदर्भीय अनुक्रमांक २ येथील दि.२८/०८/२०१९ च्या शासन ज्ञापनान्वये निर्लेखित करण्यात आले. सदर वाहनाच्या विक्रीसाठी वित्त विभागाची दि. १८.०६.१९९१, दि.१५.०६.२००१ आणि दि.२२.०६.२०१६ ची संदर्भित परिपत्रके, सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांचा संदर्भीय दिनांक ३.१२.२०१४ चा शासन निर्णय यातील मार्गदर्शक सूचनांच्या अधीन राहून वेळोवेळी वित्त विभागाच्या सल्लयाने विहित कार्यपद्धती अवलंबण्यात आलेली आहे.

२. निविदा सादर करावयाच्या कालावधीत विहित पद्धतीने मोहोरबंद लिफाफ्यामधून खालील ४ निविदा या विभागाकडे प्राप्त झाल्या आहेत.

| | | |
|---|---|---|
| निविदा क्र.१ - | **श्री. यशवंत सावंत** | **- रु. २२९९९.** |
| निविदा क्र.२ - | **श्री. कय्युम खान** | **- रु. २२०००.** |
| निविदा क्र.३ - | **श्री.शेख अकबर** | **- रु. २०९९९.** |
| निविदा क्र.४ - | **श्री.शेख रियाज उस्मान** | **- रु. १२०००.** |

यामध्ये श्री. यशवंत सावंत यांची निविदा अधिकतम किंमतीची आहे.

३. सदर वाहन मार्च २००५ मध्ये खरेदी केले असल्याने १५ वर्ष पूर्ण झालेली आहेत. वित्त विभागाच्या संदर्भिय शासन परिपत्रक दि.२२.०६.२०१६ मधील परि. ३ मध्ये नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभागास, विभागाच्या ताब्यातील निर्लेखित केलेल्या शासकीय वाहनाच्या विक्रीबाबत अधिकार देण्यात आले आहेत.

४.  सदर वाहन हे पर्यावरण विभाग मार्फत विभागासाठीच खरेदी करण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमार्फत पर्य़ावरण विभाग हाच प्रशासकीय विभाग असल्याने वाहनाची विक्री या विभागामार्फत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

पर्यावरण विभागामार्फत खरेदी करण्यात आलेले आणि संदर्भिय अनुक्रमांक २ येथील २८-०८-२०१९ च्या शासन ज्ञापनाद्वारे निर्लेखित करण्यात आलेल्या शासकीय वाहन क्र. एमएच-०१, एसए-१२ ( होंडा सिटी) ची विक्री करण्यास खालील प्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे.

अ) वित्त विभागाची संदंर्भीय अनुक्रमांक ३, ४ आणि ६ येथील शासन परिपत्रकांमधील मार्गदर्शक सुचनांनुसार विहित कार्यपद्धती अवलंबून वाहन विक्रीसाठी आलेली निविदेची किंमत हातच्या किंमतीपेक्षा कमी येत असल्यास निविदा स्वीकारण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमध्ये पर्यावरम विभाग हाच प्रशासकीय विभाग असल्य़ाने विभागाकडे प्राप्त झालेल्या ४निविदांपैकी अधिकतम किंमतीची निविदा सादर केलेले श्री. यशवंत सावंत यांची रु. २२,९९९/- इतक्या रकमेची निविदा स्वीकारण्यास आणि त्यास अनुसरून शासकीय वाहन क्र. एमएच-०१, एसए-१२ ( होंडा सिटी) या वाहनाची वाहन **"जसे आहे त्या स्थितीत"** रु. २२,९९९/- (बावीस हजार नऊशे नव्यान्नव फक्त) इतक्या किंमतीस विक्री करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे.

ब) निविदा सादर केलेले अन्य ३ निविदाकार श्री. कय्युम खान, श्री.शेख अकबर आणि श्री.शेख रियाज उस्मान यांनी निविदेसाठी भरणा केलेली इसा-याची प्रत्येकी रू. ५०००/- इतकी रक्कम त्यांना परत करण्यात आली आहे.

क) श्री. यशवंत सावंत यांनी निविदा सादर करतांना सादर करतांना भरणा केलेली इसा-याची रू.५,,०००/- इतकी रक्कम निविदेच्या रू. २२,९९९/-इतक्या रकमेमधून वजा करून उर्वरित रू.१७,९९९/-(रुपये सतरा हजार नऊशे नव्यान्नव फक्त) रकमेचा भरणा विभागाच्या रोखशाखेमध्ये जमा करण्यास निविदाकार श्री. यशवंत सावंत यांना मंजूरी देण्यात येत आहे. सदर रकमेचा भरणा रोखशाखेमार्फत शासन कोषागारात करण्यात यावा.

ड) त्यानंतर निविदाकार श्री. यशवंत सांवत यांनी निविदा सूचनेमध्ये नमूद केलेल्या अटींपैकी क्र.८ नुसार प्रथमत: आवश्यक त्या कराचा भरणा करून त्याबाबतचा लेखी पुरावा या विभागाकडे सादर करावा.

इ) निविदाकार श्री. यशवंत सांवत यांनी निविदा सूचनेतील अट क्र. १२ अनुसार सदर वाहनाबाबतच्या हस्तांतरण नोंदणीबाबत सर्व प्रक्रीया स्वखर्चाने पूर्ण करावी.

ई) सदरहू सर्व प्रक्रिया पूर्ण केल्यानंतर शासकीय नवीन प्रशासकीय इमारतीच्या आवारात ठेवण्यात आलेले वाहन जसे आहे त्या स्थितीत घेऊन जाण्यासाठी त्यांना मा्न्यतेचे प्राधिकारपत्र सुपुर्द करण्यास आणि त्यानंतर वाहन श्री. यशवंत सांवत यांच्या ताब्यात देण्यास याअन्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२.  सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. डीएफपी १०१६/प्र.क्र.०७/१६/विनियम, दि. २२.०६.२०१६ मधील परिच्छेद ३ अनुसार प्रशासकीय़ विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्य़ात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००३१६१२५००५९८०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Manohar Ramchandra Bandpatte

Digitally signed by Manohar Ramchandra Bandpatte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=eb60e1f4b73938805c04b06f5c0907864cb639223a53ce540f9ce8e8e6593e5d,
serialNumber=bb7b9a28cd6d8e2b1fa8f60d210258464e6ece204d02617fbb7ed6be3db6752c, cn=Manohar Ramchandra Bandpatte
Date: 2020.03.16 17:50:05 +05'30'

**( मनोहर रा. बंदपट्टे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान सचिव (पर्यावरण) यांचे स्वीय सहायक.
६) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी,मुंबई.
७) वित्त विभाग, विनियम, मंत्रालय, मुंबई.
८) सामान्य प्रशासन माहिती तंत्रज्ञान संचालनालय,मंत्रालय, मुंबई.
९) श्री. कय्युम खान
१०) श्री.शेख अकबर,रूम नं. १०३, १५५, फ्लोअर ए, अम्रूत नगर, मुंब्रा, ठाणे.
११) श्री.शेख रियाज उस्मान, ३ए, अमित कोयना कॉलनी,आर सी मार्ग, चेंबूर, मुंबई.
१२) श्री. यशवंत सावंत, संतोष कुंज, सुभाष नगर, रूम नं.३६, असल्फा व्हिलेज, घाटकोपर (प.) मुंबई.